अहमदनगर जिल्हयातील उपजिल्हा रुग्णालय व ग्रामीण रुग्णालयांमध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याच्या कामाचे अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२१/प्र.क्र.३०८/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०२१.

**वाचा :**

१) **आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/ कक्ष-३/टे-६/अहमदगनरग्रारुवउपजिरुअग्निशमनयंत्रणा/१९८२६-२८/२१, दिनांक २४.११.२०२१.**

**प्रस्तावना :**

अहमदनगर जिल्हयातील उपजिल्हा रुग्णालय व ग्रामीण रुग्णालयामध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याबाबतचे रु.२.५३ कोटी इतक्या रक्कमचे अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

अहमदनगर जिल्हयातील उपजिल्हा रुग्णालय व ग्रामीण रुग्णालयामध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याबाबतचे अंदाजपत्रक सन २०२०-२१ च्या दर सुचिवर आधारीत आहेत. उप अभियंता (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर यांनी तयार केले आहेत. तसेच कार्यकारी अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम मंडळ नाशिक; यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच जिल्हा शल्य चिकित्सक जिल्हा रुग्णालय, अहमदनगर यांनी प्रमाणित केले आहे. त्यानुसार रु.२.५३ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालील प्रमाणे त्या खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | रुग्णालयाचे नाव | प्र.मा.ची रक्कम |
|---|---|---|
| १ | उपजिल्हा रुग्णालय, कर्जत | रु.३२,०१,७१५/- |
| २ | उपजिल्हा रुग्णालय, पाथर्डी | रु.३२,०२,०८४/- |

| अ.क्र. | रुग्णालयाचे नाव | प्र.मा.ची रक्कम |
|---|---|---|
| | **एकूण-अ** | **रु. ६४,०३,७९९/-** |
| ३ | ग्रामीण रुग्णालय, टाकळी ढोकेश्वर | रु.८,६९,२४२/- |
| ४ | ग्रामीण रुग्णालय, पारनेर | रु.८,७२,११५/- |
| ५ | ग्रामीण रुग्णालय,श्रीगोंदा | रु.८,७२,६८४/- |
| ६ | ग्रामीण रुग्णालय, जामखेड | रु.८,७२,२५७/- |
| ७ | ग्रामीण रुग्णालय, चिचोंडी पाटील | रु.८,७२,४८४/- |
| ८ | ग्रामीण रुग्णालय, बोधेगाव | रु.८,७१,१४८/- |
| ९ | ग्रामीण रुग्णालय, शेवगाव | रु.८,७३,२५२/- |
| १० | ग्रामीण रुग्णालय, नेवासा | रु.८,६९,८११/- |
| ११ | ग्रामीण रुग्णालय,वांबोरी | रु.८,७२,२५७/- |
| १२ | ग्रामीण रुग्णालय, ताहराबाद | रु.८,७३,०५३/- |
| १३ | ग्रामीण रुग्णालय, राळेगाव | रु.८८,५३,६३५/- |
| १४ | ग्रामीण रुग्णालय, व ट्रामा केअर संगमनेर | रु.१७,४४,९६९/- |
| १५ | ग्रामीण रुग्णालय, श्रीरामपूर | रु.८,७२,४८४/- |
| १६ | ग्रामीण रुग्णालय,कोपरगाव | रु.८,७१,१४८/- |
| १७ | ग्रामीण रुग्णालय, पुणतांबा | रु.८,७३,२५२/- |
| १८ | ग्रामीण रुग्णालय, राहता | रु.८,७२,६८४/- |
| १९ | ग्रामीण रुग्णालय, लोणी | रु.८,६९,८११/- |
| २० | ग्रामीण रुग्णालय, कोतुळ | रु.८,७२,२५८/- |
| २१ | ग्रामीण रुग्णालय, राजुर | रु.२,७३,०५३/- |
| २२ | ग्रामीण रुग्णालय,अकोले | रु.८,७२,११५/- |
| २३ | ग्रामीण रुग्णालय, शमशेरपूर | रु.८,६९,२४२/- |
| २४ | ग्रामीण रुग्णालय, राहुरी | रु.२,८२,६३८/- |
| | **एकूण-ब** | **रु.१,८८,६२,२४१/-** |
| | **एकूण-"अ" व "ब"** | **रु.२,५२,६६,०४०** |

**अटी व शर्ती :-**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास मुख्य अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी काढलेल्या त्रुटीची पूर्तता करणे व मुख्य अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक दिनांक २९.१०.२०१८ अन्वये अंदाजपत्रकातील दरसुची बाहय दर मंजुरी करणे बंधनकारक आहे.

३) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर कामाची वेगवेगळी निविदा न करता सर्व कामाची एकत्रित निविदा करण्यात यावी.

५) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

६) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्यात्या-भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

७) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

८) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

९) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही - २०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

१०) उपरोक्त १ ते ९ येथील अटीची पूर्तता करण्याची जबाबदारी सबंधित जिल्हा शल्य चिकित्सक व कार्यकारी अभियंता,(विदयुत) यांची राहील.

३. उपरोक्त परिच्छेद क्र.२ येथील प्रपत्रातील अनुक्रमांक १ व २ येथील उपजिल्हा रुग्णालय, कर्जत व जामखेड या रुग्णालयाच्या कामावरील रु. ६४,०३,७९९/- इतका खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

४. परिच्छेद क्र.२ येथील प्रपत्रातील अनुक्रमांक ३ ते २४ येथील ग्रामीण रुग्णालयाच्या कामावरील रु.१,८८,६२,२४१/- इतका खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०२- ग्रामीण आरोग्य सेवा, ०४- सार्वजनिक आरोग्य, १०४- सामुहिक आरोग्य केंद्र, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ०३९१), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

५. सदर ग्रामीण रुग्णालयामध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याच्या कामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

६. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२९१७३८०७३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, cn=Roshani Dinesh Kadam Patil
Date: 2021.11.29 18:30:22 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, अहमदनगर.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अहमदनगर.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३).